**आणीबाणीच्या कालावधीत बंदिवास सोसाव्या लागलेल्या व्यक्तींचा सन्मान/यथोचित गौरव <u>करणेबाबत.....</u>**
**श्रीमती सविता प्रकाश मोरे .**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : बियुडी-१४२४/प्र.क्र.५८/स्वासैक-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १२.०७.२०२४.

**<u>संदर्भ</u>**: १) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, क्रमांक निवृवे-१०१५/प्र.क्र.२६१/२०१५(२०१८)/स्वासैक-१, दि. १४/०२/२०१८
२)सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, क्रमांक निवृवे-१०१५/प्र.क्र.२६१/२०१५(२०१८)/स्वासैक-१, दि. १५/११/२०१८
३)सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, क्रमांक निवृवे-१०१५/प्र.क्र.२६१/२०१५(२०१८)/स्वासैक-१, दि. ०३/०७/२०१८
४)सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, क्रमांक निवृवे-१०१५/प्र.क्र.२६१/२०१५(२०१८)/स्वासैक-१, दि. ३१/०७/२०२०
५) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, क्रमांक संकिर्ण-१९१८/प्र.क्र.४०/स्वासैक-१, दि.२८/०७/२०२२
६)सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, क्रमांक बीयुडी १४२२/प्र.क्र.१९७/स्वासैक-१, दि.२५/०५/२०२३
७) जिल्हाधिकारी (सा.प्र.), मुंबई शहर यांचे पत्र क्र. जि.अ.मुं.श /सा.प्र. / सविता मोरे/ निधी/ २०२४/९५३९, दि.१९.०६.२०२४

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र राज्याचे अधिवासी असलेल्या दि.२५.०६.१९७५ ते दि.२१.०३.१९७७ या आणीबाणी कालावधीत लोकशाहीसाठी लढा देणाऱ्या मिसा व डी.आय.आर. अंतर्गत सामाजिक व राजनैतिक कारणासाठी कारावास भोगलेल्या व्यक्तींचा सन्मान / यथोचित गौरव करण्यासाठी बंदिवास/कारावास कालावधीनुसार त्यांना रु.१०,०००/- अथवा रु.५,०००/- व त्यांच्या पश्चात पती/पत्नीस निम्मे मासिक मानधन अनुज्ञेय आहे.

सन २०२४-२५ या वित्तीय वर्षाकरीता, मागणी क्र.ए-५, प्रधान लेखाशीर्ष २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ६०-इतर सामाजिक सुरक्षा व कल्याण कार्यक्रम, १०२ सामाजिक सुरक्षेखालील निवृत्तिवेतन, (००) (०५) आणिबाणीच्या कालावधीत लोकशाहीकरिता लढा देणाऱ्या व्यक्तींना आर्थिक मदत (अनिवार्य) ५० इतर खर्च (२२३५ सी २०५) या लेखाशीर्षाखाली रु.५०,६३,४६,०००/- इतकी अर्थसंकल्पीय तरतूद मंजूर आहे.

संदर्भाधीन क्र.०७ येथील जिल्हाधिकारी, मुंबई शहर यांच्या दि.१९.०६.२०२४ रोजीच्या पत्रान्वये श्रीमती सविता प्रकाश मोरे, माहिम, मुंबई यांनी सादर केलेल्या पुराव्यानुसार सन १९७५-१९७७ या आणीबाणीच्या कालावधीत लोकशाहीकरिता लढा देताना कारावास भोगल्याचे दिसून येत असल्यामुळे, त्यांना पात्र यादी क्र.०४, दि.१८.०६.२०२४ नुसार दरमहा रक्कम रु.५०००/- प्रमाणे दि.१५.११.२०१८ ते माहे जून २०२४ या कालावधीतील मानधन अदा करण्याकरिता रु.३,३७,५००/- इतका निधी उपलब्ध करुन देण्याची विनंती केली आहे. त्या अनुषंगाने सदर निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

जिल्हाधिकारी, मुंबई शहर यांच्या संदर्भ क्र.०७ येथील दि.१९.०६.२०२४ रोजीच्या पत्रान्वये प्राप्त अहवालानुसार, श्रीमती सविता प्रकाश मोरे, माहिम, मुंबई यांना "आणीबाणीच्या कालावधीत बंदिवास सोसाव्या लागलेल्या व्यक्तींचा सन्मान / यथोचित गौरव करणेबाबत" या योजनेतंर्गत दि.१५.११.२०१८ ते माहे जून २०२४ या कालावधीतील मानधन प्रदान करण्याकरिता रु.३,३७,५००/- (अक्षरी रुपये तीन लाख सदतीस हजार पाचशे फक्त) इतका निधी जिल्हाधिकारी, मुंबई शहर यांना मंजूर व वितरित करण्यात येत आहे.

२. सदर मानधन वितरित करण्याची कार्यवाही करुन त्याबाबतचा अहवाल शासनास सत्वर सादर करावा. संबंधित जिल्हाधिकारी यांनी खर्च झालेल्या रक्कमेचे उपयोगिता प्रमाणपत्र तात्काळ शासनास सादर करावे.

३. जिल्हाधिकारी, मुंबई शहर यांना वितरीत करण्यात येणाऱ्या निधीतून खर्च केलेल्या अनुदानाच्या रकमांचा ताळमेळ महालेखापाल-१, मुंबई/महालेखापाल-२ नागपूर यांचेकडे विहित कालावधीत करुन खर्चमेळाचा मासिक अहवाल नियमितपणे सादर करावा.

४. याप्रित्यर्थ होणारा खर्च मागणी क्र.ए-५, प्रधान लेखाशीर्ष २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ६०- इतर सामाजिक सुरक्षा व कल्याण कार्यक्रम, १०२ सामाजिक सुरक्षेखालील निवृत्तिवेतन, (००) (०५) आणिबाणीच्या कालावधीत लोकशाहीकरिता लढा देणाऱ्या व्यक्तींना आर्थिक मदत (अनिवार्य) ५० इतर खर्च (२२३५ सी २०५) या लेखाशीर्षाखाली सन २०२४-२०२५ या आर्थिक वर्षाकरिता मंजूर असलेल्या अर्थसंकल्पिय तरतूदीमधून भागविण्यात यावा व त्याच लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. तसेच खर्च झालेल्या रक्कमेचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक क्रमांक २०२४०७१२१३००३५४८०७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by BHAGYASHREE RAJENDRA BHAIDKAR
Date: 2024.07.12 13:15:03 +05'30'

**( भाग्यश्री भाईडकर )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

०१.मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
०२.मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
०३.मा.उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
०४.मा.मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
०५.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १, मुंबई.
०६.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र २, नागपूर.
०७.विभागीय आयुक्त, कोकण विभाग, कोकण.
०८. जिल्हाधिकारी, मुंबई शहर.
०९.अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१०.निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
११.सामान्य प्रशासन विभाग, का.२५, मंत्रालय, मुंबई.
१२.कक्ष अधिकारी, वित्त विभाग, (अर्थसंकल्प १४ / व्यय-४) मंत्रालय, मुंबई.
१३.निवड नस्ती/स्वासैक-१.